**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभागाच्या ताब्यात असलेल्या शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था/ तंत्र माध्यमिक शाळा/ केंद्रे/वसतिगृहांची जागा इतर विभाग/ शासकीय संस्था/शासकीय-निमशासकीय संस्था/महामंडळे/खाजगी संस्था यांना न देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक : जमीन २५११/२०२३/प्र.क्र.७९/व्यशि-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ३० जून, २०२३.

**प्रस्तावना :-**

कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभागांतर्गत “व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय कार्यरत असून या संचालनालयाची स्थापना उद्योगांकरीता आवश्यक असणारे कुशल मनुष्यबळ उपलब्ध करुन देण्याकरीता सन १९८४ मध्ये करण्यात आली आहे.

व्यवसाय शिक्षण संचालनालयाने वेगवेगळ्या व्यवसायातील कुशल कामगारांचे प्रवाह सुनिश्चित करणे, प्रशिक्षणाने कामगारांची गुणवत्ता सुधारणे आणि औद्योगिक उत्पादन वाढवणे. शिक्षित युवकांना उपयुक्त औद्योगिक रोजगारासाठी सुसज्ज करणे ही उद्दीष्टये निश्चित केली आहेत. सदर उद्दीष्टये साध्य करण्यासाठी राज्यामध्ये ४१९ शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, १६३ शासकीय तंत्र माध्यमिक शाळा / केंद्रे तसेच २१९ वसतिगृहे कार्यरत आहेत. या औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधून प्रशिक्षणार्थींना १ ते २ वर्षांपर्यतचे आय.टी.आय.चे अभ्यासक्रम देण्यात येवून त्यांना प्रमाणपत्र प्रदान करण्यात येते. याकरीता या संस्थांकडे स्वमालकीची/भाडेतत्वावरील जागा उपलब्ध आहे.

२. तथापि, राज्य शासनाचे विविध विभाग/शासकीय-निमशासकीय संस्था/ इतर घटकांकडून राज्यातील विविध जिल्ह्यामधील/तालुक्यातील कार्यरत औद्योगिक प्रशिक्षण संस्थांच्या ताब्यात असलेल्या जागेची वारंवार मागणी होत आहे. तसेच इतर विभागाकडून त्यांच्या अखत्यारीतील प्रशिक्षणार्थीकरीता वसतिगृह बांधण्यासाठी देखील औद्योगिक प्रशिक्षण संस्थांच्या जागेची मागणी होत असते. याचबरोबर संस्थेच्या ताब्यातील काही जागा मतदार याद्या तयार करणे व इतर प्रयोजनाकरीता घेण्यात आल्या असून सदर जागा परत मिळविण्यासाठी विभागाकडून प्रयत्न सुरु आहे.

३. बदलत्या कालानुरुप तंत्रज्ञानानुसार औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधील अभ्यासक्रमाचे स्वरुप तंत्रज्ञानाशी सुसंगत करण्यात येत असल्याने औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये प्रवेश घेणा-या प्रशिक्षणार्थ्यांची संख्या दिवसेंदिवस वाढत आहे. यामुळे भविष्यात राज्यातील औद्योगिक प्रशिक्षण संस्था ही उद्योगांसाठी मध्यवर्ती प्रशिक्षण केंद्रे होणार आहेत. ही बाब लक्षात घेवून औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचे विस्तारीकरण करुन सदरच्या संस्था अद्ययावत सोयीसुविधा युक्त बनविण्यासाठी विभागाकडून सदर संस्थांचा विस्तृत आराखडा तयार करण्याची कार्यवाही प्रगती पथावर आहे.

त्यानुषंगाने कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभागाकडून उपरोक्त शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था/तंत्र शाळांमध्ये मागणीनुसार अद्ययावत कौशल्यावर आधारित व्यावसायिक अभ्यासक्रम सुरु करणे, अल्प कालावधीचे कौशल्याधारित कोर्सेस प्रशिक्षणार्थ्यांना उपलब्ध करुन देणे,

व्यावसायिक अभ्यासक्रमांच्या माध्यमातून विधायक उपक्रमाच्या वस्तुंची निर्मिती करण्यासाठी कार्यशाळा निर्माण करणे, नवउद्योजकतेची ओळख करुन देणे, समुपदेशन/इनक्युबेशन/कौशल्य प्रशिक्षण केंद्र/ मॉडेल करिअर सेंटर्स स्थापन करणे, औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधील प्रशिक्षणार्थींच्या प्रशिक्षणासाठी उद्योग क्षेत्रातील नामवंत कंपन्यांना सुक्ष्म व लघु उद्योग केंद्रांच्या उभारणीसाठी सहाय्य करणे, महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठाच्या उपकेंद्रांसाठी जागा उपलब्ध करुन देणे यांसारखे अनेक कौशल्याभिमुख उपक्रम सुरु आहेत.

४. उपरोक्त वस्तुस्थिती लक्षात घेता कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभागाच्या स्वमालकीच्या जागेव्यतिरिक्त आणखी जागेची आवश्यकता या विभागास लागणार आहे. यानुषंगाने विभागाच्या अंतर्गत कार्यरत असलेल्या औद्योगिक प्रशिक्षण संस्था, शासकीय तांत्रिक विद्यालये व वसतिगृहे यांच्या ताब्यात असलेल्या जागा अन्य विभाग वा कोणत्याही संस्थांना न देण्याबाबत निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग व विभागाच्या अधिनस्त असलेल्या सर्व शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, शासकीय तंत्र माध्यमिक शाळा/ केंद्रे व वसतिगृहे यांच्या ताब्यात असलेल्या जागा अन्य विभाग/वा कोणत्याही संस्थांना/मंडळे/महामंडळे यांना उपलब्ध करुन देता येणार नाही असा निर्णय सदरहू शासन निर्णयान्वये घेण्यात येत आहे.

२. तथापि, "काही अपवादात्मक परिस्थितीत जसे की आप्तकालीन परिस्थिती, नैसर्गिक आपत्ती अथवा अशा प्रकारच्या इतर घटना घडल्यास एखाद्या विभागास तत्कालीन परिस्थितीत जागेची आवश्यकता लागल्यास व संबंधित विभागाने जागेची मागणी केल्यास अशा प्रकरणी जागा हस्तांतरीत करण्यासंदर्भात मा.मंत्रिमंडळाची मान्यता घेवून कार्यवाही करण्यात येईल."

३. सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०६३०१३१८०६१८०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VAISHALI MACHHINDRANATH TAMBE

Digitally signed by VAISHALI MACHHINDRANATH TAMBE
Date: 2023.06.30 13:19:59 +05'30'

(वै.म.तांबे)

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत:-**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी.
४. मा.सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
५. मा.अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
६. मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद/विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
७. सर्व सन्माननीय विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई.

८. मा.मंत्री, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव (सर्व)
१०. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
११. प्रधान सचिव, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
१४. महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१६. मंत्रालयीन सर्व विभाग
१७. सर्व विभागीय आयुक्त
१८. सर्व जिल्हाधिकारी
१९. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय,नवी मुंबई.
२०. कुलगुरू, महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ, मुंबई.
२१. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी, मुंबई.
२२. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटी, मुंबई.
२३. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई.
२४. संचालक, महाराष्ट्र राज्य कौशल्य, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण मंडळ, मुंबई.
२५. सर्व सह सचिव/उप सचिव/विशेष कार्य अधिकारी(उप सचिव दर्जा), कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई.
२६. निवडनस्ती (व्यशि-२).